सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये “प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियान” या राज्य योजनेंतर्गत निधी वितरित करण्याबाबत.......

महाराष्ट्र शासन
कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग
शासन ज्ञापन क्रमांक : कौरोउ-२०२४/प्र.क्र.३४/कौशल्य-१
२ रा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ फेब्रुवारी,२०२५.

वाचा :

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र : २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५.
२) वित्त विभाग शासन परिपत्रक,दिनांक १ एप्रिल, २०२४ व शासन परिपत्रक दिनांक २५ जुलै, २०२४.
३) म.रा. कौ. विकास सोसायटी यांचे पत्र क्रमांक MSSDS/PMKUVA/२०२४-२५/२०६३/ दि. ०४ मार्च, २०२४
४) कौशल्य,रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन ज्ञापन क्रमांक : कौविउ-२०२४/प्र.क्र.३४/ कौशल्य-१/दिनांक १२ फेब्रुवारी, २०२४.
५) म.रा. कौ. विकास सोसायटी यांचे पत्र क्रमांक MSSDS//FAA/२०२४-२५/५९/ दि. १५/०१/२०२४
६) म.रा. कौ. विकास सोसायटी यांचे पत्र क्रमांक MSSDS/२०२४/१८/ दि. ०१/०१/२०२५

ज्ञापन :-

कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभागांतर्गत कार्यरत असलेल्या प्रमोद महाजन कौशल्य विकास व उद्योजकता अभियानांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये रु. २५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. त्यातील रु.७५.०० कोटी इतका निधी सं.क्र.४ येथील ज्ञापनान्वये महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीला वितरीत केला असून सं.क्र.५ येथील पत्रान्वये उर्वरित निधी वितरीत करण्याची विनंती महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीने शासनास केली आहे.

२. उक्त बाबीस अनुसरुन प्रमोद महाजन कौशल्य व उद्योजकता विकास अभियानांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पित रु.२५०.०० कोटी इतक्या निधीमधून शिल्लक असलेल्या रु.१५०.०० कोटी इतक्या निधीमधून रु.७५.०० कोटी (पंचाहत्तर कोटी मात्र) इतका निधी मागणी क्रमांक झेडए-२, २२३० कामगार व सेवायोजन, (०१) (०८) प्रमोद महाजन कौशल्य विकास व उद्योजकता अभियान (कार्यक्रम) लेखाशिर्ष (२२३० ६११८), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीला वितरीत व खर्च करण्यास या शासन ज्ञापनान्वये मान्यता देण्यात येत आहे.

३. राज्य शासनाने उक्त कार्यक्रमासाठी वितरीत केलेला निधी आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता यांनी कोषागारामधून आहरीत करून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांना खर्चासाठी उपलब्ध करून देण्यात यावा. याकरीता आयुक्त, कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” तसेच सहायक संचालक (लेखा) कोकण भवन यांना “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निधी आयुक्त, कौशल्य विकास,

रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांनी महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांना तात्काळ उपलब्ध करुन देऊन या संदर्भातील लेखे अद्ययावत ठेवावेत.

४. उपरोक्त निधी ज्या कारणास्तव उपलब्ध करुन देण्यात आला आहे त्याच कारणास्तव विहित कालावधीत खर्च करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी यांची राहील. तसेच त्यांनी दिनांक ०१.०१.२०२५ रोजी शासनास दिलेल्या कामाच्या तक्त्यानुसार सदर निधी खर्च करावा. तसेच प्रत्यक्ष खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित कालमर्यादेत सादर करण्याची दक्षता आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांनी घ्यावी.

५. सदरहू शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय नियमावली भाग पहिला उपविभाग-तीन, परिच्छेद क्र. २७(२) अन्वये प्रशासनिक विभागास दिलेल्या अधिकारांस तसेच वित्त विभाग परिपत्रक दिनांक २५ जुलै,२०२४ मधील तरतुदींस अनुसरुन तसेच वित्त विभाग अनौपचारिक सं.क्र.३१/व्यय-६ दिनांक ०५/०२/२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर निधी खर्च करताना वित्त, नियोजन,माहिती व जनसंपर्क, माहिती व तंत्रज्ञान तसेच उद्योग,ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, परिपत्रक, शासन निर्णयांचे पालन करण्यात यावे.

६. सदरहू शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२५०२१४१२४८५२२५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Digitally signed by MANOJ DATTATRAY JADHAV
Date: 2025.02.14 12:49:53 +05'30'

**(मनोज जाधव)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे.
५. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
६. कार्यासन अधिकारी, प्रशा-३ कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती (कौशल्य -१), कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.